किरकोळ केरोसिन परवाने व रास्तभाव
दुकान परवाने वारसाने वर्ग करण्याकरीता
कुटुंबाच्या व्याख्येबाबत

महाराष्ट्र शासन
अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः रॉकेल-१५१४/प्र.क्र.२३२/ना.पु.२७
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२
दिनांक : ११ जून, २०१५

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक-साविव्य-१०९१/२४२४/प्र.क्र.६१७८/ना.पु.२८, दि. २२ डिसेंबर, १९९७
२) शासन निर्णय क्रमांकः अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक-साविव्य-१०००/९३५/प्र.क्र.७२/२०००/ना.पु.२८, दि. ७ जून, २०००.
३) शासन परिपत्रक क्रमांकः अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक-रॉकेल-२१९३/१०१७/प्र.क्र.३३९०/ना.पु.२७, दि. २१ जुलै, २०००.
४) शासन परिपत्रक क्रमांकः अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक-रॉकेल-२१९९/२०००/प्र.क्र.११२/ना.पु.२७, दि. २८ ऑगस्ट, २०००
५) शासन परिपत्रक क्रमांकः अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक-रॉकेल-२१९३/१०१७/प्र.क्र.३३९०/ना.पु.२७, दि. २४ नोव्हेंबर, २०००.
६) शासन निर्णय क्रमांकः अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक-रॉकेल-२१९९/२०००/प्र.क्र.११२/ना.पु.२७, दि. १६ ऑगस्ट, २००१.
७) शासन निर्णय क्रमांकः अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक-साविव्य-१००२/१२८४/प्र.क्र.९८२/ना.पु.२८, दि. २६ एप्रिल, २००२.
८) शासन निर्णय क्रमांकः अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक-साविव्य-१००३/२८६०/प्र.क्र.१३८४/ना.पु.२८, दि. १० डिसेंबर, २००३.
९) शासन निर्णय क्रमांकः अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक : रॉकेल-१००३/प्र.क्र.३२४९/ना.पु.-२७, दिनांक २० फेब्रुवारी, २००४
१०) रिट याचिका क्र.५५९२/२००९ मध्ये मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.१३.८.२०१४ रोजी दिलेले आदेश.

प्रस्तावना -

राज्यातील किरकोळ केरोसीन परवानाधारक व रास्तभाव दुकान परवानाधारक याचे निधन झाल्यानंतर त्याचा परवाना त्याच्या पश्चात असलेल्या वारसाच्या नावे वर्ग करण्याबाबत उपरोक्त नमूद

येथील शासन निर्णयान्वये वेळावेळी आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. या प्रकरणी निर्गमित करण्यात आलेल्या उपरोक्त आदेशांचे अवलोकन केले असता कुटुंबाच्या व वारसाच्या तरतूदीत किरकोळ केरोसीन परवाने व रास्तभाव दुकान परवाने यांच्याबाबतीत एकवाक्यता आढळून येत नसल्याचे दिसून आले आहे. त्यामुळे या दोन्ही परवानाधारकांच्या बाबतीत कुटुंब व वारसाच्या तरतूदीत सूसुत्रता असणे आवश्यक असल्याने तसेच उपरोक्त शासन निर्णयातील तरतूदीमध्ये विवाहित मुलीचा समावेश वारसाच्या व्याख्येत करण्यात आलेला नाही. सदर बाबीस मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र.५५९२/२००९ मध्ये आव्हानित करण्यात आले. सदर रिट याचिकेवर मा.उच्च न्यायालयाने दि.१३ ऑगस्ट, २०१४ रोजी दिलेल्या निर्णयात विवाहित मुलीचा समावेश वारसाच्या व्याख्येत करण्याबाबत निदेश दिले आहेत. मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार केरोसिन परवाने वारसाच्या नावे मंजूर करताना विवाहित मुलीचा समावेश वारसाच्या व्याख्येत करण्याची बाब व दोन्ही परवानाधारकांच्या बाबतीत एकसूत्रता राहण्याच्या दृष्टिने या पुर्वीच्या सर्व नमूद शासन निर्णयातील कुटुंबाची व वारसदाराची तरतूद अधिक्रमित करून सर्वंकष तरतूदी असलेला शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

२. किरकोळ / हॉकर्स / अर्धघाऊक केरोसिन परवानाधारकाच्या व रास्तभाव दुकानधारकाच्या मृत्यूनंतर परवानाधारकाच्या वारसाच्या नावे परवाना वर्ग करतांना, कुटुंबाची व्याख्या खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे. मृत परवानाधारकाचा परवाना वर्ग करण्याकरीता पुढील प्राथम्यक्रम विचारात घेण्यात यावा. लागू असलेल्या प्राथम्यक्रमामध्ये एकापेक्षा अधिक वारसदारांचे अर्ज प्राप्त झाल्यास सदरचा प्राथम्य क्रम अबाधित ठेऊन त्या संवर्गातील सर्व वारसदारांची संमती प्रतिज्ञापत्राद्वारे प्राप्त झाल्यानंतर विचार करण्यात यावा. अशा प्रकारे संमती प्राप्त न झाल्यास परवाना रद्द करण्यात यावा. मात्र, प्रथमत: अपंग व त्यानंतर महिला यांना प्राधान्य देण्यात यावे.

(एक) पुरूष परवानाधारकाच्या बाबतीत एक वा अनेक पत्नी, यामध्ये न्यायिक फारकत घेतलेल्या पत्नीचाही समावेश होतो.

(दोन) महिला परवानाधारकाच्या बाबतीत पती, यामध्ये न्यायीक फारकत घेतलेल्या पतीचाही समावेश होतो.

(तीन) अवलंबित आई-वडील

(चार) सज्ञान मुलगे, यात सावत्र सज्ञान मुलगे आणि दत्तक सज्ञान मुलगे यांचाही समावेश होतो.

(पाच) अविवाहीत सज्ञान मुली. यात सज्ञान मुली आणि दत्तक सज्ञान मुली यांचाही समावेश होतो.

(सहा) घटस्फोटीत मुली (घटस्फोटीत मुलीने पुर्नविवाह केल्यास परवाना रद्द होईल.)

(सात) विधवा मुली यात सावत्र मुली आणि दत्तक मुली यांचाही समावेश होतो.

(आठ) वडील - ज्यांना व्यक्तिगत कायद्यानुसार दत्तक विधानास परवानगी असेल अशा व्यक्तीच्या बाबतीत, दत्तक आई-वडील

(नऊ) आई-ज्यांना व्यक्तिगत कायद्यानुसार दत्तक विधानास परवानगी असेल अशा व्यक्तीच्या बाबतीत, दत्तक आई-वडील

(दहा) सून / विधवा सून

(अकरा) भाऊ / सावत्र भाऊ

(बारा) सज्ञान अविवाहीत बहिणी आणि विधवा बहिणी. यात सज्ञान सावत्र बहिणीचाही समावेश होतो.

(तेरा) विवाहित मुली, आणि

(चौदा) पूर्वी मृत्यू पावलेल्या मुलांची / मुलींची सज्ञान अपत्ये.

३. सदर तरतूद शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू राहील. उपरोक्त संदर्भाधिन नमूद केलेल्या शासन निर्णयातील अन्य सर्व तरतूदी तशाच अंमलात राहतील. याबाबतच्या निर्णयासाठी प्रलंबित असलेली प्रकरणे या शासन निर्णयातील तरतूदीनुसार निर्णयित होतील. मात्र, यापूर्वी निर्णयित झालेली प्रकरणे पुन्हा सूरू करण्यात येणार नाहीत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१११७२३२५५७०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Govind Thosar

Digitally signed by Kishor Govind Thosar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kishor Govind Thosar
Date: 2015.06.11 17:25:43 +05'30'

( कि.गो.ठोसर )

अवर सचिव

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग

**प्रत,**

१. सर्व विभागीय आयुक्त
२. सर्व उप आयुक्त (पुरवठा)
३. नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई
४. सर्व जिल्हाधिकारी ( मुंबई शहर व उपनगर वगळून )

५. सर्व अपर जिल्हाधिकारी ( मुंबई शहर व उपनगर वगळून )

६. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी

७. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी

८. वित्तिय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई

९. उपसंचालक, नागरी पुरवठा ( गो/वा ), मुंबई

१०. संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई

११. सर्व उपसचिव / अवर सचिव/कक्ष अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई

१२. मा.मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव

१३. मा.राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव

१४.सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक

१५. निवडनस्ती